**महासमादेशकांचे कार्यालय, होमगार्ड, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या आस्थापनेवरील उप महासमादेशक या अस्थायी पदास मुदतवाढमिळणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : एचजीएस-२०२०/प्र.क्र.६२/विशा-८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२,
दिनांक : २३ जुन, २०२०

वाचा:- १) गृह विभाग, शासन निर्णय क्र. एचजीएस २०१८/प्र.क्र. ०२/विशा-८, दि.१८/१०/२०१९
२) वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक : पदनि-२०१६/प्र.क्र. ८/१६/आ.पु.क., दि.१२/०२/२०२०
३) होमगार्ड, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र मस/कार्या-२/२०२०/१५४, दिनांक १८/०१/२०२०

**प्रस्तावना :**

महासमादेशक होमगार्ड, महाराष्ट्र राज्य, मुंबई या कार्यालयाच्या आस्थापनेवरील उपमहासमादेशक, या अस्थायी पदास दि. ०१/१०/२०१९ ते दि. २९/०२/२०२० पर्यंत संदर्भ क्रमांक १ येथील शासन निर्णय दि. १८/१०/२०१९ अन्वये मुदतवाढ देण्यात आली होती. सदर मुदतवाढ दि. २९/०२/२०२० रोजी संपली आहे. वित्त विभाग शासन निर्णय दि.१२/०२/२०२० अन्वये आकृतीबंधात समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना तसेच, यापूर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतु ज्यांचा समावेश आकृतीबंधात करण्यात आलेला नाही, अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना दिनांक ०१/०३/२०२० ते दि. ३१/०८/२०२० पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार प्रशासकीय विभागांना देण्यात आले आहेत. यास्तव महासमादेशक होमगार्ड महाराष्ट्र राज्य, मुंबई या कार्यालयाच्या आस्थापनेवरील उपमहासमादेशक. या अस्थायी पदास दिनांक ०१/०३/२०२० ते दि. ३१/०८/२०२० पर्यंत पर्यंत मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यास अनसरुन शासन खालीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

महासमादेशक होमगार्ड, महाराष्ट्र राज्य, मुंबई या कार्यालयाच्या आस्थापनेवरील उपमहासमादेशक वेतनश्रेणी (रुपये ६७,०००-७९,०००+ HAG) Pay Matrix level १५ (७ th Pay commission) या अस्थायी पदासदिनांक ०१/०३/२०२० ते दि. ३१/०८/२०२० पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

२. या पदांवर होणारा खर्च मागणी क्र.१ मुख्य लेखा शिर्ष “२०७०-इतर प्रशासनिक सेवा १०७-होमगार्ड, ०१ वेतन” या लेखाशिर्षाखाली वर्ग करण्यात यावा व सदरचा खर्च वित्तीय वर्षासाठी मंजूर अर्थसंकल्पिय अनुदानातुन भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय वित्त विभाग क्रमांक पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६ आ.पु.क.,दिनांक १२/०२/२०२० अन्वये अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याबाबत प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्यांचा संकेताक क्र. २०२००७२११२१२५१७८२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Deepak Vasant Sawant

Digitally signed by Deepak Vasant Sawant
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=43cdfecb6fd26ff7b1b970520962ebf72d86546b92151214820b2bb31f3ccac8, cn=Deepak Vasant Sawant
Date: 2020.07.21 14:21:18 +05'30'

**( दि.व.सावंत )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत माहिती तथा योग्य त्या कार्यवाहीस्तव अग्रेषित :

१) महासमादेशक, होमगार्ड, महाराष्ट्र राज्य,मुंबई.
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई.
३) महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई.
४) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
६) वित्त विभाग, आ.पु.क., मंत्रालय,मुंबई.
७) निवड नस्ती, विशा-८ कार्यासन, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.